सन २०१८-१९ मधील अर्थसंकल्पीत तरतूदीचे वितरण करणेबाबत- लेखाशिर्ष (२४२५ २४१७) “महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास नाफेडच्यावतीने पणन महासंघामार्फत करण्यात आलेल्या खरेदीच्या जाहिरातीच्या देयकाची रक्कम अदा करण्याकरिता येणा-या अनुषंगीक खर्चासाठी अर्थसहाय्य”

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-सपस-२०१८/प्र.क्र.२१/२४ स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३ जून, २०१८.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
क्रमांक :- सपस-२०१८/प्र.क्र. २१/२४ स, दिनांक २२/०३/२०१८

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग,
क्रमांक:- अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८

प्रस्तावना:-

सन २०१३-१४ मध्ये केंद्र शासनाने आधारभूत दराने विविध कडधान्ये, तृणधान्य व तेलबिया यांची खरेदी करण्यासाठी नाफेड या संस्थेची प्रमुख अभिकर्ता म्हणून नेमणूक केली आहे. राज्यात सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई या संस्थेची उप अभिकर्ता म्हणून नियुक्ती केली जाते. किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत नाफेडच्यावतीने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत करण्यात येत असलेल्या खरेदीकरिता येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी अर्थसहाय्य (२४२५ २४१७) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रुपये १००.०० लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या दिनांक २/४/२०१८ च्या परिपत्रकान्वये २०१८-२०१९ प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर,२०१८ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांवरील खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत वितरित करण्यास प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार पणन महासंघास जाहिरातीची देयके अदा करण्याकरिता निधी उपलब्ध करुन देण्यासाठी “महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास नाफेडमार्फत खरेदी केलेल्या शेतमालाची रक्कम अदा करण्याकरिता येणा-या अनुषंगीक खर्चासाठी अर्थसहाय्य” या योजनेच्या

(२४२५ २४१७) अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ७० % रक्कम निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

हंगाम २०१७-१८ करिता किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत नाफेडच्या वतीने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत करण्यात आलेल्या खरेदीच्या जाहिरातींच्या देयकाची रक्कम अदा करण्याकरिता येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी पणन महासंघास **रुपये ७०,००,०००/- (रुपये सत्तर लाख फक्त)** इतकी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१८-१९ च्या पुढे नमूद लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पिय तरतुदीमधून भागविण्यात यावाः-

**मागणी क्रमांक व्ही-२**

२४२५ सहकार,

(००) (१०८), इतर सहकारी संस्थांना सहाय्य

(०१) पणन सहकारी संस्था,

(०१) (२२) म.रा.स.पणन महासंघास नाफेडमार्फत खरेदी केलेल्या शेतमालाची रक्कम अदा करण्याकरिता येणा-या अनुषंगीक खर्चासाठी अर्थसहाय्य **(२४२५ २४१७)**

**३३ - अर्थसहाय्य**

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केला आहे, त्याच कारणासाठी वापर करुन संबंधित महासंघाने त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल विनाविलंब शासनास सादर करावा.

४. या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेला **रुपये ७०,००,०००/-** “(रुपये सत्तर लाख फक्त) इतकी रक्कम RTGS सुविधेद्वारे महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास अदा करावी. याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| मागणीदार/पुरवठादार/कंत्राटदाराचे नाव/फर्मचे नाव | महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या. मुंबई |
| कार्यालयाचे नाव व पत्ता (ज्या प्रकरणी लागू आहे) | कनमूर हाऊस,नरसीनाथा स्ट्रीट,पो.बॉ.क्र ५०८०,मस्जीद,मुंबई-९ |

| | |
|---|---|
| बँक खाते क्रमांक | ६२४२९१८३२९ |
| बँक खात्याचा प्रकार | चालू खाते. |
| बँकेचे नाव | इंडियन बँक |
| बँक शाखेचे नाव व पत्ता | शाखा मांडवी, मस्जीद |
| बँक शाखेचा संकेतांक | ०००१६ |
| एमआयसीआर क्रमांक | 400019016 |
| आयएफएससी संकेतांक | IDIB000M013 |

५. या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्यासाठी श्री.र.गं.बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री.का.गो.वळवी, उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई-३२ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / वित्तीय संस्थांना वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकम प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये उपरोक्त बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून, सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ परिच्छेद या योजनेस लागु नाहीत. तसेच दिनांक १८.४.२०१७ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१३१२२३१७९७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2018.06.13 12:25:36 +05'30'

**(सुनंदा मो.घड्याळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

२. मा.राज्य मंत्री(पणन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३. अप्पर मुख्य सचिव(पणन) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई-९
५. सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,पुणे
६. पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे
७. महालेखाकार, महाराष्ट्र- १,(लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), मुंबई/ नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
१०.सहसंचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन,मंत्रायल,मुंबई
११.वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -३ व १३ ,मंत्रालय, मुंबई
१२.अवर सचिव (कार्यासन १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.कार्यासन अधिकारी,(रोख शाखा)सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई (३ प्रती)
१४.निवड नस्ती (२४स ).